जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत इमारत बांधकामाच्या प्रशासकीय मान्यतेच्या वित्तीय अधिकारात वाढ करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. : डिएपी - १०२१/प्र.क्र. २४७/का.१४८१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०२२

**संदर्भ :** १. नियोजन विभाग शासन निर्णय क्र.: जिवायो १००७/प्र. क्र.३९/का.१४४४, दि. १६.०२.२००८

२. नियोजन विभाग शासन परिपत्रक क्र.: ससमा २०१०/प्र. क्र.४८ (भाग-१)/ का.१४६१, दि. ११.०६.२०१८

**प्रस्तावना:-**

नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत स्थानिक स्वराज्य संस्थांकडील (जिल्हा परिषद, नगर पालिका, महानगरपालिका, नगरपंचायत) कामे वगळता उर्वरित सर्व कामांना प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रशासकीय विभाग प्रमुखांचे सर्व अधिकार जिल्हाधिकारी यांना सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती या नात्याने प्रदान करण्यात आले आहेत.

नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागांमार्फत सचिव समितीच्या निर्णयार्थ सादर करावयाच्या नवीन कार्यालयीन, निवासी व इतर इमारतींच्या बांधकाम प्रस्तावांच्या वित्तीय मर्यादेत रु. ५.०० कोटी वरुन रु. १५.०० कोटी इतकी वाढ करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत कामांना प्रशासकीय मान्यता देण्याच्या जिल्हाधिकारी यांच्या वित्तीय मर्यादेत वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन परिपत्रक:-**

१. जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत नवीन निवासी, कार्यालयीन व इतर इमारत बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याच्या जिल्हाधिकारी यांच्या वित्तीय मर्यादेत रु. ५.०० कोटीवरुन रु. १५.०० कोटी एवढी वाढ करण्यात येत आहे. सचिव समितीकडे फक्त रु. १५.०० कोटी वरील नवीन निवासी, कार्यालयीन व इतर इमारत बांधकामांचे प्रस्ताव सादर होणार असल्याने जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत जिल्हाधिकारी यांनी त्यांच्याकडे संबंधित आर्थिक वर्षामध्ये संबंधित लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणारा नियतव्यय व दायित्व यांचा सारासार विचार करुन संदर्भ २ येथील नमूद करण्यात आलेल्या नियोजन विभागाच्या परिपत्रकातील परि. क्र.२ येथे नमूद सुत्रांच्या आधारे एकूण प्रशासकीय मान्यता देण्याच्या वावाची मर्यादा परिगणित करावी.

३. वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२/२०२२/व्यय-८, दि. ११.०१.२०२२ अन्वये हे शासन परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन परिपत्रक उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०२२२१८५०४४९६१६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANJEEV HARISHCHANDRA DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.02.22 18:53:39 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव ,मंत्रालय ,मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सह सचिव ,मंत्रालय ,मुंबई
३. मा. राज्यमंत्री, (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन ,मंत्रालय ,मुंबई
५. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
६. विभागीय आयुक्त (सर्व)
७. जिल्हाधिकारी (सर्व)
८. उप आयुक्त (नियोजन) विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
९. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
१०. नियोजन विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव
११. वित्त विभाग, का. व्यय-८
१२. निवड नस्ती, का-१४८१, नियोजन विभाग.